एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमकरिता आर्थिक वर्ष २०१७-१८ साठी एप्रिल व मे २०१७ करिता यशदा, पुणे या संस्थेस वेतनाकरिता लेखानुदान वितरित करण्याबाबत (१ ला हफ्ता)

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्र. टिआरएन-०४१६/प्र.क्र.४५/१६/१८-ब
मंत्रालय, मुंबई
दि.०८/०५/२०१७

वाचा :-१) वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र. अर्थसं-२०१७/प्र.क्र.६८/अर्थ-३,दि.०१/०४/२०१७
२) सामान्य प्रशासन विभाग, परिपत्रक क्रमांक-बीयुडी-२०१७/प्र.क्र.७० /२०१७/२५, दि.०५/०४/२०१७
३) यशदा, पुणे यांचे पत्र क्र.बजेट२०१७-१८/१०१६/(५४/१६)/सीपीटीपी प्रशा, दि.२४/०४/२०१७

**प्रस्तावना :-**

शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, दि. २०/०१/२०१४ नुसार शासन सेवेमध्ये सरळसेवेने नियुक्त होणाऱ्या गट-अ व गट-ब मधील विविध संवर्गातील अधिकाऱ्यांसाठी एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. या प्रशिक्षण कार्यक्रमासाठी यशंवतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे या संस्थेला सन २०१७-१८ या आर्थिक वर्षाच्या खर्चासाठी अर्थसंकल्पीय अंदाजामध्ये रु. ६३२.५२लाख (रुपये सहा कोटी बत्तीस लाख बावन्न हजार फक्त) इतकी आर्थिक तरतूद करण्यात आली असून त्यापैकी रु. १०५.४२ लाख (रुपये एक कोटी पाच लाख बेचाळीस हजार फक्त) एवढे लेखानुदान नियंत्रक अधिकाऱ्यांच्या स्वाधीन करण्यात आले होते.

**शासन निर्णय :-**

२. यशदा, पुणे या प्रशिक्षण संस्थेस माहे एप्रिल व मे २०१७ या दोन महिन्यासाठी वेतनाच्या खर्चासाठी खालीलप्रमाणे अनुदान मंजूर करण्यात येत आहे

| अ.क्र. | उपशीर्ष | अर्थसंकल्पीत वितरण प्रणालीवर वितरित तरतूद |
|---|---|---|
| | लेखाशीर्ष-ए-४, २०७० इतर प्रशासकीय सेवा ००-००३ प्रशिक्षण (००)(१२) यशदा, पुणे या संस्थेस एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रमासाठी सहायक अनुदान (२०७००८७१) ३१ सहायक अनुदान (वेतन) | **८,५२,०००/-** |

३. सदरहू मंजूर करण्यात आलेले अनुदान संबंधित कोषागारातून काढून घेतल्यानंतर ती काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शीर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र १५ दिवसांच्या आत शासनास सादर करावे.

४. सदर तरतूद यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे यांचेकडे सुपूर्द करण्यात येत असून याकरिता ते आहरण व संवितरण अधिकारी म्हणून काम पाहतील. यशदा, पुणे या संस्थेने खर्च विहित मर्यादेत राहील, याची दक्षता घ्यावी. त्याचप्रमाणे महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका व वित्तीय अधिकार नियमपुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या नियमांचे तसेच संदर्भ क्र. ३ येथील शासन परिपत्रक, वित्त विभाग अन्वये विहित केलेल्या अटी व तरतूदींचे पालन यशदा, पुणे यांनी करावे.

५. यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे या संस्थेने आता वितरित करण्यात येत असलेल्या अनुदानाचे विनियोग प्रमाणपत्र (UTILIZATION CERTIFICATE) महालेखापाल, लेखापरीक्षा, महारष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर व शासनाला तातडीने सादर करावे.

६. यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे या संस्थेने उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर यांना राहतील व त्याकरिता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

७. यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे या संस्थेचे आहरण व संवितरण अधिकारी यांनी संस्थेस वितरित करण्यात येत असलेल्या अनुदानाची रक्कम **रु.८,५२,०००/-(रुपये आठ लाख बावन्न हजार फक्त)** आहरित करावी.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०५१५११०८२३७४०७ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ajit Sopanrao Deshmukh

Digitally signed by Ajit Sopanrao Deshmukh
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3d2bd4ed83b4c722151f75f40dad09e69527159e04d26476bbf5363e7b1c3cb2, cn=Ajit Sopanrao Deshmukh
Date: 2017.05.15 15:43:29 +05'30'

**(अजित देशमुख)**
**अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग**

**प्रति,**

१. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
२. प्रधान सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
३. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे
४. लेखाधिकारी, यशदा, पुणे (३ जादा प्रतीसह)
५. सहसंचालक, लेखा व कोषागारे, (संगणक शाखा), मुंबई
६. जिल्हा कोषागार कार्यालय, पुणे
७. वित्त विभाग (व्यय-४/ अर्थसंकल्प-१४), मंत्रालय, मुंबई
८. अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन-२५, मुंबई-३२
९. निवडनस्ती